**ग्रामरक्षक दल नियम, २०१७ अनुसार अवैध मद्य विक्री, वाहतूक तसेच सार्वजनिक शांततेस बाधा आणणाऱ्या मद्यपिंविरूध्द करावयाच्या कार्यवाहीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन परिपत्रक, क्रमांक:बीपीए-०११७/प्र.क्र.२२/राउशु-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १८ एप्रिल, २०१७.

परिपत्रक:-

राज्यात अवैध दारु उत्पादन, वाहतूक व विक्री आढळून आल्यास अशा ठिकाणी अवैध धंद्याचे उच्चाटन करण्यासाठी करावयाच्या प्रतिबंधात्मक कार्यवाही शासनस्तरावरून वेळोवेळी सूचना देण्यात आल्या आहेत. महाराष्ट्र दारुबंदी (सुधारणा) अधिनियम, २०१६ (महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १९/२०१७) शासन राजपत्रात दिनांक १६ जानेवारी, २०१७ रोजी प्रसिध्द करण्यात आला आहे.त्यानुसार ग्रामस्तरावर ग्रामरक्षक दल स्थापन करण्याबाबत ग्रामरक्षक दल नियम, २०१७ शासन अधिसूचना, दि.२२ मार्च, २०१७ अन्वये प्रसिध्द केले आहेत.

२. महाराष्ट्र दारुबंदी अधिनियमातील तरतूदीनुसारचे अवैध मद्य विक्री, बाळगणे, वाहतूक करणे इ. गुन्ह्यांबाबतची माहिती नजीकचे पोलीस स्टेशन अथवा संबंधीत अधिकारी यांना ग्रामरक्षक दलाच्या सदस्याने देण्यासंदर्भातील तरतूद विहित करण्यात आली असून त्यानुसार अधिकारी / कर्मचारी यांनी करावयाच्या कार्यवाहीसंदर्भात पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

१) अवैध दारु उत्पादन व विक्री संदर्भात ग्रामरक्षक दलाकडून माहिती मिळताच पोलीस विभाग / राज्य उत्पादन शुल्क विभागाने १२ तासाच्या आत कार्यवाही करुन गुन्हे दाखल करण्यात यावेत.

२) दारु पिऊन गावात गोंधळ घालणाऱ्या, मारामाऱ्या करणाऱ्या इसमांबाबत ग्रामरक्षक दलाकडून संबंधित अधिकाऱ्यांना कळविल्यानंतर मद्यपान केलेल्या इसमांस नशा असेपर्यंत शक्य तितक्या लवकर ताब्यात घेवून त्याची प्रथमत: वैद्यकीय तपासणी करून महाराष्ट्र दारुबंदी कायदा, १९४९ च्या कलम ८५ नुसार त्यांच्यावर कायदेशीर कारवाई करावी.

३) दारुविषयी गुन्हेगारी कृत्य करणाऱ्या सराईत व्यक्तीविरुध्द महाराष्ट्र दारुबंदी अधिनियमाच्या कलम ९३ अन्वये चांगल्या वर्तणूकीचे हमीपत्र संबंधीत व्यक्तीकडून घेण्याबाबत कायद्यातील प्रचलित तरतूदीनुसार आवश्यक कार्यवाही करण्यात यावी. तसेच, सराईत गुन्हेगार व्यक्तीविरुध्द महाराष्ट्र पोलीस अधिनियमाच्या कलमानुसार हद्दपारीची आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

४) अवैध मद्य निर्मिती व विक्री व्यवसाय करणाऱ्या इसमांवर तीन वेळापेक्षा जास्त गुन्हे नोंदविण्यात आल्यास व शिक्षा झाल्यास अशा इसमांवर हद्दपारीचा प्रस्तावासाठी पोलीस विभागाने कालमर्यादा विहित करावी. अशा कालमर्यादेत प्रस्ताव सादर न केल्यास संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्यावर कर्तव्यात कसुरीबाबत प्रशासकीय कारवाई करावी.

५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने व्यसनमुक्ती धोरणानुसार शैक्षणिक संस्था, महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमात व्यसनांच्या दुष्परिणामांची माहिती समाविष्ट करणेबाबत कार्यवाही करावी. तसेच पोलीस विभाग व राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या सहाय्याने जनतेत जागृती करण्यासाठी चित्रफीत, जाहिरात, लोककला, पथनाटय, नभोवाणी व दूरदर्शनद्वारे इ. माध्यमातून व्यसनमुक्तीचा प्रचार व प्रसार करावा.

४. सदर परिपत्रकातील सूचनां सर्व पोलीस घटक प्रमुख यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व पोलीस ठाणे प्रमुख यांच्या तसेच अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांनी त्यांच्या अधिपत्या खालील निरीक्षकांच्या निर्दशनास आणून याची अंमलबजावणी योग्य रीतीने होईल याकडे परिपूर्ण लक्ष देऊन कार्यवाही करावी.

५. सदर परिपत्रक गृह विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०४१८१७३८१७१२२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

७. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2017.04.18 18:02:55 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२. मा.मंत्री, राउशु यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.राज्यमंत्री, राउशु यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (गृह), राज्य उत्पादन शुल्क, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
८. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क विभाग,
९. सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक
१०.सर्व जिल्हाधिकारी/जिल्हा दंडाधिकारी
११.सर्व पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक
१२.सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क
१३.सर्व सह सचिव / उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती (राउशु-३)